**अनधिकृतपणे गैरहजर राहणा-या कर्मचाऱ्यावर वेळीच कार्यवाही करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

वित्त विभाग,

शासन परिपत्रक क्र. :अरजा- २४०५ /प्र.क्र.८/सेवा-८.

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२. दिनांक :- १५ सप्टेंबर , २००५.

**परिपत्रक**

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः सेनिवे-१०.०१/१३०/सेवा-४, दिनांक २ जून, २००३ च्या परिशिष्ट-१ मधील अ.क्र. ३ नुसार रजेशिवाय अनुपस्थित राहिल्याचा कालावधी भूतलक्षी प्रभावाने असाधारण रजेत परिवर्तीत करण्याचे पूर्ण अधिकार नियुक्ती प्राधिका-यांना प्रत्यायोजित करण्यात आले आहेत.

२. तथापि महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम १६ अनुसार पाच वर्षापेक्षा अधिक अनधिकृत गैरहजेरी / अनुपस्थिती असाधारण रजेत परिवर्तीत करण्यासाठी शासनाची मान्यता आवश्यक आहे. पाच वर्षापेक्षा जास्त म्हणजे पंधरा ते सोळा वर्षापर्यंतच्या अनधिकृत गैरहजेरीची / रजेशिवाय अनुपस्थितीची बरीच प्रकरणे असाधारण रजा म्हणुन मंजूर करण्यासाठी वित्त विभागास प्राप्त होत असतात. अशा प्रकरणात अनधिकृत अनुपस्थिती संदर्भात वेळीच कारवाई न केल्यामुळे निवृत्तीवेतन / कुटुंबनिवृत्तीवेतन तसेच इतर सेवाविषयक लाभ संबधित शासकीय कर्मचा-यास / त्यांच्या कुटुंबियास मिळण्याकरिता म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील संबंधित नियम शिथिल करुन त्यांची अनधिकृत / रजेशिवाय अनुपस्थिती नियमित करण्याचे बरेच प्रस्ताव वित्त विभागात प्राप्त होतात.

३. वास्तविकतः जे शासकीय कर्मचारी कारणाशिवाय किंवा अल्प कालांतराने वैद्यकीय प्रमाणपत्र सादर करुन कार्यालयात अनुपस्थित असतील / राहतील त्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ३२, नियम ४० आणि नियम ४१ अनुसार वैद्यकीय मंडळासमोर तातडीने उपस्थित राहण्यास सांगण्यात यावे. वैद्यकीय मंडळाने सेवेत रुजु होण्यास पात्र असल्याबाबतचे प्रमाणपत्र दिल्यानंतरही जर संबंधित कर्मचारी सेवेत रुजु होत नसेल किंवा संबंधित कर्मचारी वैद्यकीय मंडळासमोर उपस्थित रहात नसेल तर संबंधित कर्मचा-याच्या विरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल ) नियम १९७९ अंतर्गत शिस्तभंगाची कार्यवाही करावी आणि तशी कार्यवाही विहीत कालावधीत न करणाऱ्या सक्षम प्राधिका-यावर या संबंधातील जबाबदारी निश्चित करावी हे तत्व नियमांना अभिप्रेत आहे.

४. तद्नुषंगाने असे पुनश्च उद्धृत करण्यात येत आहे की, सर्व मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रीय कार्यालयांना अशा सूचना द्याव्यात की, रजेशिवाय अनुपस्थित असणा-या कर्मचा-यांसंदर्भात महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील संबंधित तरतूदींचे योग्य प्रकारे अनुपालन केले जाईल याबाबत कृपया दक्षता घेण्यात यावी व रजेशिवायच्या अनुपस्थितीबाबत संबंधितांविरुद्ध महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या तरतुदीनुसार शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात यावी. व ती विभागीय चौकशी नियम पुस्तिका १९९१ मधील प्रकरण- ३ मधील परिच्छेद ३.१९ (१) मध्ये नमूद

(कृ. मा. प.)

केलेल्या विहित कालावधीत पूर्ण करावी. शक्यतोवर अशी प्रकरणे प्रादेशिक विशेष चौकशी अधिकारी किंवा जिल्हा चौकशी अधिकारी यांचेकडे सूपर्द न करता विभागातीलच अधिकाऱ्यांची चौकशी अधिकारी व सादरकर्ता अधिकारी म्हणून नियुक्ती करुन अशा प्रकारची चौकशीची प्रकरणे त्वरीत निकाली काढण्याची दक्षता घेण्यात यावी.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**नसीमा म. शेख**
**शासनाचे उपसचिव**

प्रति,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई (८० प्रती),
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर (८० प्रती),
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई (४० प्रती),
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर (४० प्रती),
महालेखापाल (वाणिज्य लेखापरीक्षा) मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी ,मुंबई (४० प्रती),
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव व सचिव, मंत्रालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, महाराष्ट्र राज्य, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपील शाखा, महाराष्ट्र राज्य, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय मुंबई,
मुख्य लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
राज्यपालांचे सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधिकाराखाली असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली,
वित्त विभागातील सर्व कार्यासने, (ग्रंथपाल ५ प्रती),
निवड नस्ती, कार्यासन सेवा-८, वित्त विभाग,

-----